७५

**नवनिर्मित तालुका न्यायालय मौदा, कळमेश्वर, हिंगणा व, भिवापूर,जिल्हा नागपूर या न्यायालयांमध्ये फर्निचरवर झालेल्या खर्चास कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
**शासन निर्णय क्र.फरनि २१०९/१०७१/(१०/१०)/का.१२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २८ डिसेंबर, २०१०.**

वाचा :-जिल्हा व सत्र न्यायालय, नागपूर यांचे क्र१८६८/रोविवि/लेखा/२००९, दिनांक २१.११.२००९ चे पत्र.

**शासन निर्णय :**

नवनिर्मित तालुका न्यायालय मौदा, कळमेश्वर, हिंगणा व भिवापूर,जिल्हा नागपूर या न्यायालयांमध्ये शासनाच्या दरकरारावर असलेल्या महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, नागपूर यांच्याकडून घेण्यात आलेल्या रु.१६,६२,७४८/-( रु.सोळा लाख बासष्ट हजार सातशे अठ्ठेचाळीस फक्त) इतक्या रकमेस पुढील अटींच्या अधीन राहून कार्योत्तर प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(अ) महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ यांच्या थकीत देयकांचा भरणा करण्यास जिल्हा न्यायालय नागपूर यांच्याकडून विलंब झाला असल्याने कोणत्याही प्रकारचे व्याज महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळाला देण्यात येऊ नये.

(ब) भविष्यात कोणतीही खरेदी शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय करण्यात येऊ नये.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान, १०५-दिवाणी व सत्र न्यायालये, १०५ (दोन) जिल्हा व सत्र न्यायाधिश, संकेतांक क्रमांक (२०१४ ०१७२) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७०५/१०, दि. १८.१२/२०१० अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शिरीष संकपाळ )
कार्यासन अधिकारी

प्रति,
प्रबंधक, उच्च न्यायालय (अ.शा.), मुंबई (पत्राने).
प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, नागपूर ,
महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर .
विधी व न्याय विभाग, का.२३ व २४,.७
महाराष्ट्र लघु उद्योग विकास महामंडळ, नागपूर
निवड नस्ती.